आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२३-२४ साठी योजनांचे मूल्यमापन, संनियंत्रण व उपयोगिता तपासणे योजनेसाठी निधी वितरीत करण्याबाबत. (मुख्य लेखाशीर्ष - २२२५एफ२८१)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः बीयुडी-२०२३/प्र.क्र.०२ /कार्यासन ६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - २० मार्च, २०२४.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, दि.८.१२.२०२३, दि.५.०२.२०२४ व दि.४.०३.२०२४.
२) शा.नि.आ.वि.वि.बीयुडी-२०२२/प्र.क्र.०२/का-६ दि.२४.०३.२०२३,दि.८.११.२०२३.
३) आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक यांचे पत्र क्र.शाआशा-२०२३/प्र.क्र.०९/का ६(४)१७२१, दि.११.०३.२०२४.
४) आदिवासी विकास विभागाची नस्ती क्र. *File No.:MTD-34021/46/2024-DESK 13A-Tribal Development* (लेपअ-२०२२/प्र.क्र.१४८/का-१३).

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत राज्यातील शासकीय व अनुदानित आश्रमशाळांना भेट देऊन तुलनात्मक अभ्यास करुन आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांचा कल रोखण्यासाठी प्रभावी उपाययोजना सुचविण्यासाठी दि.२२.०२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्स (TISS) या संस्थेची नियुक्ती करण्यात आली आहे.

त्यास अनुसरुन अभ्यास गटाचे मानधन, प्रवास खर्च व कार्यालयीन खर्च याकरीता टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्स (TISS), मुंबई यांनी मागणी केल्यानुसार पहिल्या हप्त्याकरीता म्हणून रु.३.०० लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील दि२४.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला आहे. तसेच या प्रयोजनार्थ दुसऱ्या हप्त्यासाठी रु.६.२६१११ लाख इतका निधी संदर्भाधीन क्र.२ येथील दि.८.११.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना वितरीत करण्यात आला आहे. आता संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्राप्त प्रस्तावाच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र. ४ येथील नस्तीवरील झालेल्या मान्यतेस अनुसरून प्रस्तुत प्रयोजनार्थ सन २०२३-२४ या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित तरतुदींतून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय व अनुदानित आश्रमशाळांच्या तुलनात्मक अभ्यासाकरीता नियुक्त टाटा इन्स्टिट्युट ऑफ सोशल सायन्सच्या अभ्यास गटाच्या मानधन, प्रवास खर्च व कार्यालयीन खर्चापोटी आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष, २२२५ - अनुसूचित जाती,अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण खाली सन

२०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु.लाखात)**

| **योजनेचे नाव व लेखाशिर्ष** | **बाब** | **सन २०२३-२४ साठी अर्थसंकल्पिय तरतूद** | **सन २०२३-२४ सुधारीत अंदाज** | **सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत योजनांचे मूल्यमापन, सनियंत्रण व उपयोगिता तपासणे (२२२५ एफ२८१) | २८, व्यावसायिक सेवा | ८००.०० | ६४०.०० | १.३२८७६ |

२. उपरोक्त प्रमाणे रु.१,३२,८७६/-(अक्षरी रुपये एक लाख बत्तीस हजार आठशे शहात्तर फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. सदर वितरीत निधी राज्यातील शासकीय व अनुदानित आश्रमशाळांच्या तुलनात्मक अभ्यासाकरीता टाटा इन्स्टिटयुट ऑफ सोशल सायन्स यांना विहीत कार्यपध्दतीने अदा करण्यात यावा.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी नियंत्रक अधिकारी यांची राहील.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१४२१५९४७७५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2024.03.20 14:01:52 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

२. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.

५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.

६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

७. सर्व प्रकल्प अधिकारी (ए.आ.वि.प्र.)

८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.

९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

११.कार्यासन-१३,आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१२.निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.